# नवभारत

सप्टेंबर - २०१६



'दबिक'मध्ये इस्लामिक स्टेट (भाग - १)

मंगेश पाडगावकरांची कविता : एक रूपवादी आकलन

शेती, शेतकरी आणि शासन -- लेखांक - ६

व्यस्ततावादी वाङ्मय आणि समीक्षा

जुने लेखन



अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६९। अंक १२। सप्टेंबर २०१६
श्रावण/भाद्रपद शके १९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.











अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २०१६

## अनुक्रमणिका

---

# 'दबिक'मध्ये इस्लामिक स्टेट (भाग-१)

मुकुल रणभोर

**प्रस्तावना—**

इस्लामिक स्टेटचा अभ्यास मराठी माध्यमं/विचारवंत यांनी बहुतेक वाळीत टाकलेला आहे. मोठ्यामोठ्या घटनासुद्धा मराठी वृत्तपत्र, विचारवंत विचारातसुद्धा घेत नाहीत. खूप मोठ्यामोठ्या घटना रोज घडतात आणि मराठी माध्यमं कोणत्याही प्रकारचं डॉक्युमेंटेशन करत नाहीत, हे खरं म्हणजे चुकीचं आहे. त्यामुळे मी माझी ही जबाबदारी समजतो की, असे विचारवंत आणि माध्यमांतून दुर्लक्ष झालेले विषय मी अभ्यासले पाहिजेत आणि करता आला तितका अभ्यास इतरांना सांगितला पाहिजे.

अमेरिका-इराक युद्धाचा एक परिणाम म्हणून मध्यपूर्वेत जी अशांतता निर्माण झाली, त्यातून अनेक दहशतवादी गट उभे राहिले. त्यांतले अनेक मोडूनही पडले. पण जे काही शिल्लक उरले, त्यांनी जग अशांत करून ठेवलं आहे. जून २०१४ मध्ये एका 'अबू-बक्र-अल-बगदादी' याने स्वतःला खलिफा म्हणून घोषित केलं. जगातल्या सर्व शोषित मुसलमानांना राजकीय, आर्थिक, लष्करी, धार्मिक नेतृत्व दिलं. ही घटना २०१४ च्या जून महिन्यात घडली. कोणत्याही संघटनेला जसं कार्यक्षेत्र लागतं, तसं इस्लामिक स्टेटलासुद्धा लागतं. इराक आणि सिरीयाच्या ब-याच मोठ्या भागावर त्यांनी ताबा मिळवला होता. २०१४ साली इराकमधल्या काही तेलाच्या विहिरी त्यांच्या ताब्यात होत्या आणि अत्यंत सावध आणि तयारीनिशी त्यांनी खलिफापदाची पुनःस्थापना केली. लगेचच जुलै महिन्यात त्यांनी त्यांच्या पहिल्या मासिकाचं प्रकाशन केलं. जगातल्या सर्व संघटनांना आपले विचार लोकांनी वाचलेले हवे असतात. सर्व संघटना अनुयायी मिळावेत म्हणून धडपडत असतात, तसंच इस्लामिक स्टेटचंसुद्धा आहे. अनेकांना माहीत नसेल; पण 'अल-कायदा' आणि ओसामा बिन लादेनसुद्धा एक मासिक चालवत असत. त्याचं नाव 'इन्स्पायर' असं होतं. त्या 'इन्स्पायर' या मासिकाचेसुद्धा १४ अंक प्रकाशित झाले आहेत. 'इन्स्पायर' वाचल्यानंतर आणि 'दबिक' वाचल्यानंतर असं लक्षात येईल की, अल-कायदाच्या मासिकाचा आवाका मोठा आहे, अनेक विषय त्यात हाताळले गेले आहेत. पण आजच्या घडीला अल-कायदापेक्षा जास्त मोठा धोका इस्लामिक स्टेटचा आहे. त्यामुळे आज विचार फक्त 'इस्लामिक स्टेटच्या मासिकाचा करायचा. हा विषय मांडताना मी कोणतंही माझं मत नोंदवणार नाही. 'दबिक'चा अभ्यास करताना मला जे दिसलं, ते मी सांगणार आहे.

**बहिरंग परीक्षण—**

जुलै २०१४ मध्ये इस्लामिक स्टेटनी त्याचं पहिलं मासिक प्रकाशित केलं. 'अल-हयात' या इस्लामिक स्टेटच्या मीडिया सेंटरकडून ते प्रकाशित केलं जातं. ते इंग्लिश, फ्रेंच, अरेबिक, जर्मन, रशियन इत्यादी जागतिक भाषांमध्ये प्रकाशित होतं. प्रकाशन मुख्यतः इंटरनेटवरच होत असावं. कारण सार्वजनिक ठिकाणी कोणीही माणूस इस्लामिक स्टेटचं मासिक विकायचं धाडस करणार नाही. आतापर्यंत 'दबिक' या मासिकाचे १५ अंक प्रकाशित झाले आहेत. शेवटचा अंक जून २०१६ मध्ये प्रकाशित झाला आहे. १५ मधले ६ अंक २०१४ या वर्षात प्रकाशित झाले, पुढचे ६, २०१५ मध्ये. या वर्षात केवळ ३ अंक प्रकाशित झाले आहेत. शेवटचा अंक आता जून महिन्यात प्रकाशित झाला आहे. पण तो कुठेही सापडत नाही. प्रत्यक्ष इस्लामिक स्टेटच्या अधिकृत वेबसाइटवरसुद्धा तो मिळत नाही. 'दबिक'ला मासिक म्हणता येणार नाही; कारण ते दर महिन्याला नियमित प्रकाशित होत नाही. कधी दोन महिन्यांनी, कधी तीन महिन्यांनी, अशी अनियमितता त्यात आहे. आपण आपल्या सोयीसाठी त्याला मासिक म्हणू. सर्व अंकांची सरासरी पृष्ठसंख्या ५५-६० इतकी आहे. पण शाब्दिक भाग वेगळा काढला तर A४ आकाराची १८-२० पानं इतका मजकूर होतो.

अनुक्रमणिका

सर्वांत आधी म्हणजे अत्यंत व्यावसायिक डोकं वापरून ही मासिकं तयार केलेली आहेत. आपली मतं सांगण्यासाठी अनेक ठिकाणी फोटो, कोटेशन्स वापरून मासिक सजवलेलं आहे. (मासिकाचे ले-आउट लावण्याचा मला अनुभव असल्यामुळे दबिक तयार करताना त्यांनी घेतलेले कष्ट भरपूर आहेत, हे लक्षात येतं.)

सर्व मासिकांचा एक त्या त्या काळानुसार कोणतातरी एक प्रधान विषय आहे. त्यानुसार कव्हर स्टोरी, इस्लामिक स्टेटच्या बातम्या, विशेष लेख, इस्लामिक स्टेटचे अहवाल अशी समान सदरं सर्व मासिकांत आहेत. अजून एक महत्त्वाचं सदर आहे, ते म्हणजे 'The Islamic State In The Words of Enemy' त्यामध्ये मुख्यतः पाश्चात्त्य जग इस्लामिक स्टेटबद्दल काय म्हणतं, हे सांगितलं आहे. उद्या जर कोणी इस्लामिक स्टेटचा इतिहास लिहायला घेतला तर त्याला या मासिकांचा खूप उपयोग होईल आणि असा उपयोग व्हावा, असं त्याचं स्वरूप आहे. सर्व मासिकांचा समान भाग म्हणजे प्रस्तावना. सर्व अंकांना एक प्रस्तावना आहे. सर्व अंकांच्या प्रस्तावनांचे विषय अर्थात वेगळे आहेत, म्हणून प्रत्येकाचा विचार स्वतंत्र करावा लागेल. सर्व अंकांचे विषय आणि संदर्भ वेगवेगळे आहेत, त्यामुळे कोणतेही जनरल विधान करणे योग्य नाही. प्रत्येक अंकांचा स्वतंत्र विचार पुढच्या लेखात करण्यात येईल.

मासिकाच्या नावापासून आतील लेखांपर्यंत सर्व ठिकाणी या मासिकाच्या टीमने संदर्भ देण्याची पद्धत अवलंबली आहे. सर्व महत्त्वाच्या वाक्यांना संदर्भ दिले आहेत. ते संदर्भ कुठेही मोडतोड केलेले नाहीत. एकूण-एक संदर्भ जर कोणीही सामान्य माणसाने तपासले तर ते जिथून घेतले आहेत, तसेच 'दबिक'मध्ये वापरण्यात आले आहेत, असं लक्षात येईल. संदर्भ देताना अर्थात मुख्यतः कुराण वापरण्यात आले आहे. पण त्याचबरोबर ज्याला 'कुराण'चा शब्दकोश मानले जाते, अशा 'हादीस'चाही त्यांनी संदर्भ म्हणून वापर केला आहे.

**'हादीस' म्हणजे काय?**

(भारतीयांना आणि मुख्यतः हिंदूंना इस्लामबद्दल अनेकदा अज्ञान असते. म्हणून काही मुद्दे आधीच सांगणे भाग आहे.) कुराण २३ वर्षांच्या काळात क्रमाक्रमाने निर्माण झाले आहे. एका शुद्ध चारित्र्याच्या व्यक्तीला अल्लाहनी संदेश देण्यासाठी निवडले आणि ते संदेश म्हणजे कुराण आहे. परंतु केवळ कुराण वाचायला घेतले तर काही सहसा कळत नाही. त्यासाठी दोन पूर्वअटी आहेत. प्रेषित पैगंबर यांचे चरित्र आपल्याला माहीती असावे लागते आणि प्रेषितांच्या कृती आपल्याला माहीती असाव्या लागतात. त्या 'कृती' म्हणजे हादीस आहे. तेव्हा कुराणचा अभ्यास करताना हादीसचाही आधार घ्यावा लागतो. प्रेषितांच्या मरणानंतर 'खलिफा उमर दुसरा' याच्या काळात हादीसचे संकलन सुरू झाले. ह्या संकलनाच्या वेळी प्रत्यक्ष प्रेषितांना पाहिलेली दोन माणसं जिवंत होती, असं सांगितलं जातं. हादीसच्या संकलनाचे अनेकांनी प्रयत्न केले; परंतु मुस्लीम जगतात त्यांपैकी तीन लोकांना मानले जाते. त्यांमध्ये सर्वांत महत्त्वाचे 'सहिह बुखारी', 'सहिह मुस्लीम' आणि 'अबू दावूद' हे आहेत. इस्लामिक स्टेटने सर्व संदर्भ या तीन लोकांच्या हादीसमधून आणि कुराणमधून दिले आहेत आणि पुन्हा सांगतो, ते संदर्भ वापरताना त्यांनी कोणत्याही प्रकारची संदर्भातली मोडतोड केलेली नाही. 'हादीस'च्या अन्वयार्थामध्ये काही वेळेला फरक पडलेला दिसेल; पण मूळ हादीसवर कोणाचेही दुमत नाही. सर्व मुस्लीम समाज ज्याप्रमाणे कुराण मानतो, त्याच्या लगेच खालचे स्थान हादीसला आहे.

आपला विषय समजण्यासाठी इस्लामची एवढी माहिती पुरेशी आहे.

**'दबिक' म्हणजे काय?**

'दबिक' हे उत्तर सिरीयामधील एक शहर आहे. तुर्कस्तानच्या सीमेवरचा सिरीयाचा १४ वा प्रांत 'ॲलेप्पो' या प्रांतात 'दबिक' हे शहर आहे. २००४ च्या गणनेनुसार शहराची लोकसंख्या ३३६४ इतकी आहे. मे २०१६ मध्ये तयार करण्यात आलेला शेवटचा नकाशा सांगतो की, अजूनही 'दबिक' या शहरावर इस्लामिक स्टेटचे राज्य आहे. ही झाली प्राथमिक माहिती.

प्रेषितांच्या मृत्यूनंतर खलिफापद निर्माण झाले. मानवी स्वभावानुसार त्या खलिफापदासाठी वादसुद्धा निर्माण

झाले. त्या वादांतून चार खिलाफती निर्माण झाल्या. परंतु त्या सर्व इ. स. १२५८ पर्यंत टिकल्या. तेव्हासुद्धा खलिफाच्या हातात पूर्वीसारखी ताकद नव्हती. तो केवळ नामधारी राहिला होता. त्या नामधारी खलिफाला मंगोल टोळ्यांनी ठार केलं. त्याचे नातेवाईक मात्र पळून जाण्यात यशस्वी ठरले आणि ते ईजिप्तमध्ये जाऊन राहिले. इजिप्तमधल्या जनतेने त्यांच्यापैकी एकाची खलिफा म्हणून निवड केली. पण तोसुद्धा नामधारीच राहिला. त्याच्याकडे राजसत्ता नव्हती. १५१७ मध्ये तुर्कस्तानच्या सुलतानाने ईजिप्त जिंकलं. त्या खलिफाला (म्हणजे ती खलिफाची गादी) तुर्कस्तानला नेलं आणि खलिफापद निर्माण केलं, केमाल पाषाने जे खलिफापद रद्द केलं, ते हे. तुर्कस्तानच्या ईजिप्त जिंकण्याच्या मार्गात ओट्टोमान साम्राज्य आणि कैरोमधील 'मामलुक' साम्राज्य यांच्यात 'खलिफा'साठी झालेली शेवटची लढाई या 'दबिक' शहरात झाली होती.

'दबिक' या शहराचे ऐतिहासिक दृष्ट्या हे महत्त्व आहेच, पण यापेक्षा जास्त महत्त्व त्याच्या धर्मशास्त्रातील उल्लेखाला आहे. 'सहिह मुस्लीम' यांनी संकलित केलेल्या हादीसची संख्या ७५३६ इतकी आहे. बुखारी यांनी-सुद्धा संकलित केलेल्या हादीसची संख्या सहा हजारांपेक्षा जास्त आहे. पण सहिह मुस्लीम यांच्या हादीसच्या संकलनात प्रकरण ९ मध्ये आलेलं एक हादीस आहे, त्यात 'दबिक'चा उल्लेख आहे. त्यामध्ये प्रेषित सांगतात की, 'रोमन सैन्य (अर्थात क्रुसेडर सैन्य) आणि इस्लामचे सैन्य यांच्यात दबिक शहरात लढाई होईल, त्यात मुसलमान जिंकतील आणि बायझेन्टाइन मुसलमानांच्या ताब्यात येईल. मुसलमान आणि बिगरमुसलमान यांच्यातील शेवटचे धर्मयुद्ध या ठिकाणी होणार आहे, अशी या हादीसची मांडणी आहे. जिज्ञासूंनी हे हादीस मुळातून वाचावं.

सर्व अंकांच्या अनुक्रमणिकेच्या वर २००६ साली मारला गेलेला जिहादी 'अबू-मौसब-अझ-झार्क्वाई' याने कोट केलेलं हेच हादीस देण्यात आलं आहे – 'The spark has been lit here in lraq, and it's heat will continue to intensitfy-by Allah's permission – until it burns crusader armies in Dabiq' आणि हाच ह्या 'मासिकाचा हेतू' म्हणून जाहीर करण्यात आला आहे.

**आत काय आहे?**

कोणताही अंक वाचल्यास लक्षात येईल की, दोन-प्रकारचे वाचक समोर ठेवून ह्याची निर्मिती केली जाते. एक -'भविष्यात इस्लामिक स्टेटला अनुयायी मिळावेत म्हणून' आणि दोन– 'इस्लामिक स्टेटची अद्ययावत आणि अधिकृत माहिती त्यांच्या शत्रूंना मिळावी.' जर फक्त हे मुस्लीम जगताने वाचायला पाहिजे असं इस्लामिक स्टेटला वाटत असतं, तर इतर जागतिक भाषांमध्ये 'दबिक' प्रकाशित करण्याची गरज नव्हती. पहिल्या अंकाची कव्हरस्टोरी आहे 'The Return of the Khilafah' आणि त्यामध्ये जगातल्या सर्व मुसलमानांना हिजरत करून इस्लामिक स्टेटकडे येण्याचे आवाहन केले आहे. इतकच नव्हे, तर विविध क्षेत्रांतल्या तज्ज्ञांनासुद्धा इस्लामिक स्टेटला येण्याचे आवाहन करण्यात आले आहे. त्यात डॉक्टर्स, इंजिनिअर्स, वकील, पत्रकार अशा तज्ज्ञांना मुद्दाम बोलावण्यात आलं आहे. पहिल्याच अंकात असं सांगण्यात आलं आहे की, खिलाफतीच्या स्थापनेनंतर आता जगाची वाटणी दोन गटांमध्ये झाली आहे. पहिला गट, इस्लाम आणि श्रद्धावान यांचा आणि दुसरा गट, कुफ्र (श्रद्धाहीन) आणि हिप्पोक्रॅट लोकांचा. इस्लामिक स्टेटच्या एकूण कार्यक्षेत्रात येणा-या अनेक आदिवासी टोळ्यांनी इस्लामिक स्टेटला आपला पाठिंबा जाहीर केला. पहिल्या अंकात अशा चार टोळ्यांची नावं आहेत. टोळ्यांनी इस्लामिक स्टेटला आपला पाठिंबा जाहीर केल्यामुळे त्यांना कोणकोणते फायदे होणार आहेत, तेसुद्धा लिहिलं आहे. मानवी हक्कांची पुन्हा एकदा स्थापना होईल, मुस्लिमांचा फायदा व्हावा म्हणून पैशाची तरतूद करण्यात येईल, इस्लामिक स्टेटमध्ये लोकांना शांतता आणि स्थैर्य मिळेल, गुन्हेगारीचे प्रमाण कमी होईल, अर्थव्यवस्थेच्या विकासासाठी नवीन बाजारपेठा उपलब्ध होतील, असे अनेक फायदे देण्यात आले आहेत.

अर्थात इस्लाममध्ये राज्यव्यवस्था आणि धर्मव्यवस्था यांच्यात भेद नसतो. प्रो. के. एस. रामकृष्णराव म्हणाले होते की, प्रेषितांचे व्यक्तिमत्त्व अष्टादशपैलू होते, त्यांचा अनेक गुणांपैकी थोडेच मला सांगता येतील. ते म्हणतात, पैगंबर हे प्रेषित होते, सेनापती होते, राजा होते, योद्धा होते, व्यावसायिक होते,

धर्मप्रसारक होते, तत्त्वज्ञानी होते, स्टेटस्मन होते, वक्ता होते, क्रांतिकारक होते, कायदा देणारे होते, न्यायाधीश होते, संत होते. हे इस्लामचे वैशिष्ट्य आहे. इस्लामिक स्टेटच्या या 'दबिक'मध्ये त्यांचा आग्रह आहे हे सांगण्याचा की, इस्लामिक स्टेट त्यांच्या अनुयायांना धार्मिक त्याचबरोबर राजकीय नेतृत्व देईल. या दृष्टिकोनातून सर्व लेख, बातम्या लिहिल्या गेल्या आहेत. मुसलमानांना पुन्हा एकदा असे सर्वांगीण नेतृत्व मिळावे म्हणून पुन्हा एकदा खलिफापदाची स्थापना करण्यात आली आहे. (क्रमशः) ❖❖❖



अनुक्रमणिका

# मंगेश पाडगावकरांची कविता : एक रूपवादी आकलन

एच. व्ही. देशपांडे

**प्रास्ताविक :-**

१

सन १९२९ ते २०१५ हा कविवर्य मंगेश पाडगावकरांचा एकूण ८६ वर्षांचा जीवनप्रवास. केशवसुतांना आधुनिक मराठी कवितेचे जनक मानले जाते. सन १८८५ साली त्यांनी काव्यलेखनाला प्रारंभ केला. म्हणून इ.स. १८८५ ते १९२० हा आधुनिक मराठी कवितेचा पूर्वार्ध आणि १९२० ते १९४५ हा उत्तरार्ध मानला जातो. सन १९४५ नंतर बा. सी. मर्ढेकरांनी मराठी कवितेला एक वेगळे वळण दिले. महायुद्धानंतर उद्ध्वस्त झालेल्या यूरोपचे भयाण वास्तव आणि त्यातून जीवनासंबंधी आलेली निराशा हा इंग्रजी काव्याचा विषय होणे स्वाभाविक होते. मराठी कवींना हा अनुभव प्रत्यक्षपणे आला नव्हता; तरीही युरोपीय, विशेषतः इंग्रजी काव्याच्या प्रभावातून या प्रकारची मर्ढेकरप्रणीत कविता मराठीत आली. खरे म्हणजे केशवसुतांपासून मर्ढेकरांपर्यंत व पुढे काही वर्षे नवकवितेच्या माध्यमातून इंग्रजी काव्याचा मराठी कवितेवरील प्रभाव अव्याहतपणे होत राहिला आहे. 'सत्यकथा' आणि 'आलोचना' या मासिकांनी नवकवितेला अधिष्ठान प्राप्त करून दिले. इ. स. १९६५ नंतर मर्ढेकरांनंतर बापट, करंदीकर, पाडगावकर यांनी मराठी कवितेला जनाधार प्राप्त करून दिला. इंग्रजीच्या प्रभावातही आपल्या अनुभवांशी प्रामाणिक राहून मराठी कवितेचे मराठीपण जोपासण्याचे काम भा. रा. तांबे, बालकवी आणि पुढे बाकीबाब बोरकरांसारख्या अनेक कवींनी केलेले आहे. वरील कवींचा वारसा पुढे अधिक समृद्ध करणारे कवी म्हणजे कोकणचे मंगेश पाडगांवकर आणि वसंत सावंत अशी या उभयतांची ओळख आहे.

पाडगावकरांच्या कवितेचे सरळसरळ दोन प्रकार लोकांसमोर आहेत. एक म्हणजे त्यांची भावकविता-धारानृत्य (१९५०), जिप्सी (१९५२), छोरी (१९५४), उत्सव (१९६२) इ. दुसरा प्रकार म्हणजे त्यांच्या सामाजिक जाणिवांच्या कविता. यांत सलाम (१९७८), वात्रटिका, उदासबोध इ. संग्रहांतील बहुसंख्य कविता येतात.

पाडगावकरांच्या सामाजिक जाणिवांच्या कवितांची समीक्षा मार्क्सवादी समीक्षापद्धतीने करता येणे शक्य आहे काय, हे तपासून पाहणे महत्त्वाचे आहे. अजूनतरी असा ठळक प्रयत्न झालेला दिसत नाही. परंतु त्यांच्या भावकवितेची समीक्षा आस्वादाच्या अंगाने झालेली आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सौंदर्यवादी-रूपवादी समीक्षेचा विचार मराठीत प्रथमच पुढे आला आणि त्याच्या विरोधात मार्क्सवादी सामाजिक समीक्षेचाही (Sociological Criticism) विचार त्याच वेळी पुढे आला. सुमारे १९५० ते १९८५ पर्यंत हे द्वंद्वयुद्ध मराठी समीक्षेच्या क्षेत्रात खूपच गाजले. यातील अभिनिवेश बाजूला ठेवून शास्त्रशुद्ध रूपवादी समीक्षेची मांडणी प्रा. वसंत दावतर यांनी केली. पण त्या वेळच्या त्या गदारोळात त्यांचा क्षीण आवाज प्रभावी ठरला नाही. आज शांतपणे विचार करून सौंदर्यवादी (रूपवादी) समीक्षेचे महत्त्व तपासून पाहणे शक्य आहे आणि आवश्यकही आहे. म्हणूनच मंगेश पाडगावकरांच्या भावकवितेची रूपवादी समीक्षेच्या दृष्टीने काही चर्चा (प्राथमिक स्वरूपाची का असेना) करण्याचा या लेखात प्रयत्न करण्यात आला आहे. अर्थातच एका लेखात हा संपूर्ण विषय विस्ताराने मांडता येणे केवळ अशक्य आहे. हा विषय संशोधनपदवीचाच आहे. या अतिव्याप्त विषयाची पर्याप्त मांडणी करण्यासाठी त्याची प्राथमिक चौकट स्पष्ट करणे इतकाच या लेखाचा हेतू आहे.

२

**रूपवादी समीक्षासिद्धान्ताची त्रोटक पूर्वपीठिका :**

पाश्चात्त्य समीक्षासिद्धान्ताचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्याचा तत्त्वज्ञानाशी असलेला घनिष्ट संबंध. त्यांच्या वाङ्मयीन समीक्षेला, समीक्षाविचारांना नेहमीच तत्त्वज्ञानाचा आधार घेण्यात आला आहे. अगदी प्लेटोच्या

अनुक्रमणिका

अनुकरणाच्या सिद्धान्तापासून तो सार्त्रच्या अस्तित्ववादापर्यंत, (व पुढेही) ही परंपरा चालू आहे. यात ॲरिस्टॉटल, कांट, हेगेल, रुसो, फ्रॉइड, मार्क्स अशा अनेकांचा समावेश आहे.

रूपवादी समीक्षेचा उगम जर्मन तत्त्वज्ञ कांट याच्या प्रतिभाविषयक विचारात कल्पनाशक्तीच्या (Imagination) विवेचनात आहे. त्याच्या मते काव्य हे नैसर्गिक सौंदर्याचे आकृतिरूप (Representation) असते आणि कल्पनाशक्ती ही त्या रूपाची वाहक (Agent) असते. या विचारांचा प्रभाव प्रथम आंग्ल कवी कोलरीजवर पडला आणि त्याने त्याच्या (Biographia Literaria) या समीक्षाग्रंथात याची इंग्रजीतील पहिली चर्चा केली. पुढे हा धागा. I. A. Richards, Empson, Pound, Eliot या आंग्ल समीक्षकांनी घट्ट केला आणि त्याचे रूपवादातील पूर्ण स्वरूप अमेरिकन समीक्षक J. C. Ransom, Allen Tate, Cleanth Brooks, R. P. Blackmur, R. P. Warren, Kenneth Burke इत्यादींनी आकारित केले. इ. स. १९१५ पासून ही आंग्ल परंपरा (कोलरीज नंतर) अमेरिकन नवसमीक्षकांनी सन १९४५ पर्यंत विकसित केली. या सौंदर्यवादी नवसमीक्षकांचा (New Critics) प्रभाव बा. ल. कुलकर्णी, गो. म. कुलकर्णी, मर्ढेकर, गंगाधर गाडगीळ, पु. शि. रेगे, वसंत दावतर, म. सु. पाटील, सुधीर रसाळ यांच्यावर होता. त्यांनी ही सौंदर्यवादी (रूपवादी) समीक्षा (Formalism) मराठीत आणली. त्याला बेडेकर, मुक्तिबोध, लालजी पेंडसे, पु. ल. देशपांडे इ. मार्क्सवादी समीक्षकांनी विरोध केला.

खरे म्हणजे प्रा. वसंत दावतर हेच मराठीतील पहिले परिपूर्ण रूपवादी समीक्षक आहेत, असे माझे मत आहे. ('अलोचना' मधील त्यांचे लेख पहावेत) आशय आणि अभिव्यक्तीचे एकरूपत्व हे रूपवादी समीक्षेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. कवितेतील सामाजिक आशयाला दावतरांचा विरोध नव्हता. पण तो आशय कलात्मक पातळीवर आला पाहिजे, हा त्यांचा आग्रह होता कोणतीही कविता ही प्रथम 'कविता' असली पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष होता. म्हणूनच संतकाव्याचे 'रूप' त्यांना भुरळ घालीत असे.

अमेरिकन नवसमीक्षकांनी इंग्रजीतील सर्व कालखंडांतील कवितांचे रूपवादी समीक्षण केले आहे. असाच प्रयत्न मराठी कवितेच्या संदर्भातही करता येणे शक्य आहे. त्याची सुरुवात पाडगावकरांच्या काही निवडक कवितांचे संदर्भ घेऊन करण्याचा हा एक प्रयत्न आहे.

३

**रूपवादी समीक्षेची काही मूलतत्त्वे**

१) कवितेत आशय आणि अभिव्यक्ती यांची एकरूपता असते; त्यांना वेगळे काढता येत नाही.

२) अनुभवाचे सौंदर्य हे कवितेचे व्यवच्छेदक लक्षण असते.

३) कवितेतील शब्दांचे सर्व घटक कवितेच्या पूर्णत्वासाठीच आलेले असतात. म्हणजेच प्रत्येक घटकाचे (शब्दाचे अगर शब्दसमूहाचे) त्या कवितेच्या घाटामध्ये, आकृतीमध्ये, रूपामध्ये महत्त्वाचे योगदान असते.

४) कवितेच्या घाटामध्ये, रूपामध्ये अर्थांची अनेक वलये तसेच वेगवेगळे स्तर असतात आणि त्यांचा एकमेकांशी घट्ट संबंध असतो.

५) कवितेत कवीच्या भावानुभवांचे, संवेदनांचे संघटन असते आणि त्यासाठी कवीची कल्पनाशक्ती (Imagination) कवितेच्या निर्मितिप्रक्रियेत सतत कार्यरत व चैतन्यमयी असते.

६) कवितेची समीक्षा त्या कवितेतील अंगभूत घटकांच्या साहाय्यानेच करावयाची असते; कवितेचे प्रयोजन, तिचा सामाजिक परिणाम इ. बाह्य घटकांच्या आधारे नव्हे.

७) प्रत्येक कविता ही स्वतंत्र आणि अनन्यसाधारण असते; म्हणून प्रत्येक कवितेची समीक्षा वेगळी असते. ती साचेबंद असत नाही.

८) कवीचा तरल संवेदनशील भावानुभव हा सामान्य भाषेत सांगता येणार किंवा संक्रांत करता येणारा नसतो, म्हणूनच कवीला भाषेचा वेगळ्या त-हेने उपयोग करणे भाग असते. म्हणूनच तो रूपक, उपमा, दृष्टांत, संकेत, प्रतिमा, नादमयी शब्दांचे ध्वनी, शब्दांची अनोखी रचना यांचा वापर करीत असतो. ही रचना आधी घेतलेल्या

अनुभवांचे अलंकारीकरण नसते.

९) अनुभव घेण्याची प्रक्रिया हीच लेखनप्रक्रिया असते. म्हणजे अनुभवाची सुरुवात ही कवितालेखनाची सुरुवात असते आणि कविता लिहून झाली की, अनुभव घेण्याची प्रक्रियाही पूर्ण होते. म्हणूनच कविता ही वास्तवाचे प्रतिबिंब नसून ती वास्तवातील एखाद्या लहानशा आधारावर केलेली नवनिर्मिती असते.

१०) कवीचा व्यक्तिगत, आत्मनिष्ठ भावानुभव कवितेच्या भाषेच्या माध्यमातून सार्वत्रिक होऊ शकतो.

११) रूपवादी समीक्षा त्या कवितेच्या घटकांच्या संबंधांचे आणि त्यांच्या सौंदर्यनिर्मितीतील योगदानाचे स्वरूप विशद करते. म्हणून रूपवादी समीक्षक त्या कवितेच्या बाहेरच्या गोष्टींची चर्चा करीत नाही.

रूपवादी समीक्षेची ही मूलभूत तत्त्वे लक्षात घेतली की, रूपवादी अँग्लो-अमेरिकन समीक्षकांनी (म्हणून मराठी रूपवादी समीक्षेनेही) सामाजिक, चरित्रात्मक, ऐतिहासिक समीक्षेला ( Sociological, biographical, historical criticism) का विरोध केला, हे लक्षात येईल. रूपवादी समीक्षेचे स्वरूप अधिक स्पष्ट व्हावे यासाठी किमान काही महत्त्वाच्या मराठी रूपवादी समीक्षकांची काही विधाने पाहणे गरजेचे आहे.

१) "कलात्मक सौंदर्य हे रूपनिष्ठ असते आणि साहित्यात ही रूपसिद्धी संवेदनविषयांची संवेदनक्षमता आणि अशा क्षमतेने भावित संवेदनांचे एखाद्या अविष्करणातून प्रत्ययाला येणारे परस्परसंबंध यांच्या संघटित, एकरूप शब्दाविष्काराने निर्माण होते." (दावतर, १९८२, पृ. ७०)

२) "प्रत्येक कलाकृती/साहित्यकृती ही अनन्यसाधारण– दुस-यासारखी नसलेली - अशी वस्तू असल्यामुळे तिचे सौंदर्यबंध हे त्या त्या साहित्यकृतीतूनच शोधायचे, अनुभवायचे असतात. हा शोध आणि अनुभव किंवा शोधातला हा अनुभव इतरांसमोर मांडताना तो इतरांनाही शोधता येईल, अनुभवता येईल, प्रत्ययविषय बनेल अशा बैठकीवर दाखले देत, त्यातले संबंध दर्शवीत, त्याचे स्वरूप स्पष्ट करीत, त्याची संघटना उलगडीत आणि संगती प्रस्थापित करीत प्रकट केला असता साहित्यकृतीची तिची अशी समीक्षा निर्माण होते. या स्वरूपात स्पष्ट होणारे साहित्यकृतीचे मूल्यमापन केले की, सौंदर्यशास्त्रीय दृष्टीने केलेली साहित्यकृतीची समीक्षा पूर्ण होते. सौंदर्यप्रतीती ही वैयक्तिक व व्यक्तिनिष्ठ असली, तरी या पद्धतीने ती सार्वत्रिक व वस्तुनिष्ठ होते." (७२)

३) "संवेदनाबोधन साहजिकच साहित्यातील व्यक्त आशयाच्या ग्रहणातून होते. पण हा आशयाचा आशय म्हणून गुण नव्हे. संवेदनाबोधनातून व्यक्त होण्याची क्षमता जेव्हा आशयाच्या ठिकाणी असते, तेव्हाच ही प्रचिती येते. ही क्षमता आशयाच्या प्रतिमानतेमुळे आशयाला प्राप्त होते. ही प्रतिमानता म्हणजे आशयाचा अर्थ नव्हे, आशयाचे ते वास्तव नव्हे. ही आशयाची रूपधारणक्षमता असते, 'आशय' बरोबर किंवा तंतोतंत व्यक्त झाला' अशी भाषा या ठिकाणी करता येत नाही. 'आशय मूर्त रूपधारणेला संवादी होणे' अशी भाषा इथे यथोचित ठरते." (७४)

४) "रूप म्हणजे आविष्कार... रूप ही कलाकृतीची एक संघटना होय... आशयाची कलात्मक अभिव्यक्ती म्हणजे रूप... कलात्मक अनुभवाचा मानसिक विकास म्हणजे रूप." (खांडेकर, गोवारीकर, १९८९, पृ. १३९)

५) "कोणतीही मोठी वाटणारी कलाकृती आपणास अनुभवघटकांची जाणीवपूर्वक नवरचना म्हणूनही जाणवते आणि ती सचेतनाचा प्रत्ययही देते." (आचवल, १९७२, पृ. ३)

६) "ललितकृतीत लेखक कोणतीतरी 'अनुभूती' साक्षात करण्याची एकसारखी धडपड करीत असतो, हे म्हणणे वास्तविक चूक आहे. त्या कृतीच्याद्वारे तो एक अनुभव असतो आणि म्हणूनच आपण तिला सर्जन किंवा निर्मिती म्हणतो. ती (कलाकृती) काही Electrocardiogram सारखी हृदयाच्या व्यापाराचा आलेख नसते; ती प्रत्यक्ष हृदयव्यापारच असते." (रेगे, १९६८, पृ. १०५)

७) कवितेची तीन रूपे : "१) प्राकृतिक रूप- म्हणजे कवितेचे श्रवण किंवा वाचन २) प्रतिमांकित (Representational) रूप- म्हणजे शब्दांची अर्थापेक्षेत झालेली परिणती ३) मनोतीत रूप (Conceptual) म्हणजे श्रोत्याच्या किंवा वाचकाच्या व्यक्तिवैशिष्ट्यानुसार काही आप[illegible] प्रतिक्रिया त्याच्या

अनुक्रमणिका

मनात उत्पन्न होतात. त्याच्या मनोविश्वात ती कविता एक जागा घेते, एक अर्थ प्राप्त करून देते ते रूप. हे तिसरे रूप म्हणजे तो वाचक त्या कवितेला 'आत्मसात' करतो ते. म्हणजे तिला त्याने आपले असे रूप देऊन आपली केलेली असते ते रूप. हा रूपविस्तार दरवेळी वाढत जातो. कवितेचे रसग्रहण म्हणजे हा रूपविस्तार होय." (६१)

८) "साहित्यकृती ही कलाकृती असते; कलाकृतीही असते असे नव्हे, तर कलाकृतीच असते." (दावतर, १९७९, पृ. ३)

४

**पाडगावकरांची कविता : एक रूपवादी आकलन**

खरे म्हणजे पाडगावकरांच्या किमान ४/५ पूर्ण कविता घेऊन त्यांची समीक्षा करणे इथे अभिप्रेत आहे. परंतु एका कवितेची समीक्षा करावयाची म्हणजे एक स्वतंत्र लेख होईल आणि इथेतर एकाच लेखाची मर्यादा आहे; ही अडचण लक्षात घेऊन काही उदाहरणे घेऊन विषयाची फक्त चौकट स्पष्ट करावी, इतकाच विचार आहे.

वेंगुर्ल्याचा, कोकणातील पाऊस पाडगावकरांच्या कवितेतून प्रकर्षाने रिमझिमत आला आहे. पावसाची ही लहानपणीची अनुभूती व्यक्त करताना ते म्हणतात :

"पाऊस आधी गुणगुणत
झाडांच्या गळ्यात येतो
आणि मग झुलत झुला
देवळापुढच्या तळ्यात येतो..." तसेच
"फांदीवरती गोजिरवाणा
पक्षी भिजल्या पंखांचा
पाण्यावर थरथर वलयांचा
खेळ नाच-या थेंबांचा"

वरील कवितेत व्यक्त होणारा पावसाचा अनुभव खूप तरल संवेदनशील आहे आणि त्याचे शब्दरूप विलक्षण सौंदर्याने भारित असल्यामुळे आनंददायी आहे. पाडगावकरांच्या वरील कवितेतील पाऊस त्यांच्या डोळ्यांसमोर प्रथम 'झाडांच्या गळ्यात', नंतर झुलत झुलत देवळाच्या तळ्यात कसा आला असेल, हे आपण त्या शब्दांद्वारा अनुभवू शकतो. त्या पावसाच्या येण्याची 'चाल' ही पाडगावकर विलक्षण संवेदनशीलतेने फक्त दोनच भारदस्त शब्दांत व्यक्त करतात - 'झुलत झुला' ते पावसाच्या आगमनाचे चित्र आहे. एकूणच तो पावसाचा 'झुला' आहे आणि तो झुलाच झुलत झुलत येत आहे, असे हे शब्दचित्र आहे. हा झुला पाऊस एकदम येत नाही. तो आधी 'गुणगुणत' झाडांच्या गळ्यात येतो. यात झाडांवर पडणा-या पावसाचा आवाज वाचकांना प्रतीत होतो. हा गुणगुणणारा पाऊस झाडांना मिठीत घेऊन पुढे देवळापुढच्या तळ्यात येतो. इथे देवळाचा उल्लेख खूप महत्त्वाचा आहे. या चारच ओळींचा साकल्याने विचार केला तर त्यात पाऊस, झाडे, तळे आणि कवीचे मन हे सर्व त्या मंदिराच्या सान्निध्यात आलेले आहे. या एकूणच भावानुभवात निसर्ग, माणूस आणि परमेश्वार या सर्वांमधून अव्याहतपणे फिरणारे एकच एक चैतन्य अनुभवास येते. यालाच वर्ड्स्वर्थचा poetic pantheism म्हणतात.

पाडगावकरांच्या पावसाची ही अनुभूती पुढील चार ओळींमध्ये विस्तारत जाते. एक गोजिरवाणा पक्षी झाडाच्या फांदीवरती आहे. त्याचे पंख भिजलेले आहेत आणि त्या तळ्यातील पाण्यावर पावसांचे थेंब पडल्यावर जी वलये निर्माण होतात, त्यांचे अत्यंत मनोहारी वर्णन पाडगावकरांनी केले आहे. ती वलये म्हणजे थेंबांचा त्या पाण्याबरोबर चाललेला नाच. हा नाचाचा 'खेळ' विलक्षण चैतन्यदायी आहे. 'थरथर' या शब्दाचा इथे केलेला उपयोग खूप महत्त्वाचा आहे. 'पाण्यावर थरथर वलयांचा' अशी ओळ आहे. वलयांचा थरथर त्या पाण्यावर दृग्गोचर होतो, तेव्हा त्यातील हालचाल, नाद, नृत्य आणि चैतन्य यांचा एकत्रित परिणाम वाचकाच्या मनावर उमलतो. पाण्यावरील वलये, त्यांचा पाण्यावरील थरथर, त्यांचा खेळ, नाचरे थेंब (इथे 'थरथर' हे विशेषण नाही, नाम आहे.), या सर्वांत दंग झालेला भिजलेला पक्षी जणू तो कवीच त्या पक्ष्यासारखाच या सौंदर्यानंदात भिजून निघालेला आहे, हे सूचित करणारा आहे.

केवळ तीन ते चार शब्दांच्या आठच ओळी; पण त्यांतील आशयाचे सौंदर्यरूप पाडगावकर आकारित करतात. एकूण काही मोजक्याच शब्दांत पाडगावकरांनी जी भावानुभवाची अनेकपदरी वर्तुळे निर्माण केली आहेत,

जो अर्थवलयांचा विस्तार ध्वनित केलेला आहे, त्यातून जी सौंदर्याकृती निर्माण केलेली आहे, त्या सर्वांतून एक सौंदर्यानुभव व त्याचा अद्वितीय आनंद ते वाचकांपर्यंत संक्रांत करतात. ही रूपाची, आकाराची, घाटाची निर्मिती आहे आणि ती विलक्षण सृजनशील आणि चैतन्यदायी आहे.

भरभरून काही सांगण्याची उत्कट ऊर्मी आणि त्यानंतर भावणारी मौनाची अपरिहार्यता व्यक्त करताना पाडगावकर म्हणतात :

किती बोललो तेंव्हा तरीही
उरले सांगायचे,
आता कळले शब्दांपाशी
मौनच मागायचे!
शब्दांच्या-हृदयातून जेव्हा
मौनच रुजुनी येते,
दिसतच नाही पाऊस तरिही
कविता भिजून येते!

खूप बोलल्यावरही अजून काही सांगायचे राहिलेले असतेच, पण तरीही नंतर एक जाणीव मनात असते– 'शब्दांपाशी मौनच मागायचे' असते. भावानुभव आणि त्याची अभिव्यक्ती यांतील द्वंद्व इथे आकारित झाले आहे. भावानुभवांचे अनेक विभ्रम मनात गर्दी करतात, तेव्हा त्यांचे वहन करण्यासाठी नेहमीची भाषा अपुरी पडते; तेव्हा शब्दांपाशी मौन मागायचे, अशी मनाची अवस्था होते.

मौन हे शब्दांच्या हृदयात 'रुजते' ही पाडगावकरांची अनुभूती विलक्षण तरल संवेदनशील अशीच आहे. मौन धारण केले, तरी अंतःकरणात शब्दांचा कल्लोळ असतोच. मौन फक्त शब्दांच्या उच्चाराला अटकाव करते; मनातील भावभावनांना आणि त्यांच्या शब्दरूपांना नव्हे. हे अधिक स्पष्ट करण्यासाठी पाडगावकर एक दृष्टांत देतात. पाऊस दिसत नाही तरीही कविता मनातून 'भिजून येते' असे ते म्हणतात. पाडगावकरांच्या काव्यनिर्मितीची प्रक्रिया यातून स्पष्ट होते. भावानुभवाचे बीज एकदा मनात विस्तारत जाते. याचे उदाहरण त्यांच्या पुढील चार ओळींत दिसते –

छेडी सुरावट मल्हाराची
धारांच्या तारांवर वारा
लखख विजेच्या प्रतिबिंबाचा
जळात गोठुनि झाला पारा

इथे पावसाच्या धारा एखाद्या तंतुवाद्याच्या तारांसारख्या आहेत, अशी कल्पना आहे आणि या धारांच्या तारांवरून वारा वाहातो, त्या वेळी जे संगीत निर्माण होते, त्याला मल्हाररागाची सुरावट प्राप्त होते, असे पाडगावकरांना भावते. इथे फक्त सहा शब्दांमध्ये निसर्गातील पाऊस आणि वाऱ्याचे संगीत वाचकापर्यंत ते संक्रांत करतात, तेही एका विलक्षण शब्दचित्रामधून. पावसाच्या धारांशी वारा खेळत असल्याचा आणि त्या खेळातून मल्हाररागाची सुरावट निर्माण होत असल्याचे चित्रच वाचकांच्या मनावर रेखाटले जाते. पुढच्या दोन ओळींतही एक निसर्गचित्रच ते उभे करतात. पाण्यात विजेचे प्रतिबिंब पडते आणि ते गोठून जाते, त्या प्रतिबिंबाचा पारा होतो, अशीही कवीची अनुभूती आहे. विजेची उष्णता, अग्नी आणि पाण्याचा गारवा एकत्र आणून विजेच्या प्रतिबिंबाचे गोठून पाऱ्यात रूपांतर होते, अशी ही भावानुभूती आहे. अग्नीचे प्रतिबिंब पाण्यात गोठून जावे आणि त्याचा खूप जड असा पारा व्हावा, या शब्दचित्रात अर्थाची वलये आहेत, रूपविस्तार अंगभूत आहे. वाचकाच्या आकलनशक्तीला हा अनुभव आव्हान देणारा असाच आहे. पावसाच्या थेंबांचे गारांमध्ये रूपांतर होते, तद्वत विजेच्या प्रतिबिंबाचे पाऱ्याच्या गोळ्यात रूपांतर झाल्याचे हे शब्दचित्र आहे. अग्नीचे द्रवरूपात आणि द्रवाचे घनरूपात होणारे हे संक्रमण आहे. सृष्टीतील चैतन्याचा हा अनोखा खेळ आहे. नाद, रस, रंग, गंध, रेषा आणि या सर्वांचा एकत्रित आकार हा तरल संवेदनशीलतेत न्हाऊन निघतो. असाच संवेदनशील तरल अनुभव पुढील चार ओळींत प्रकट होतो –

कोसळली सर दक्षिण उत्तर
घमघमले मातीतून अत्तर
अष्टदिशांतून अभिष्ट चिंतन,
घुमला जयजयकार
पहिल्या हिरव्या तृणपात्याचा
आज असे सत्कार

हे फक्त एका तृणपात्याचे वर्णन नाही; ते संपूर्ण







अनुक्रमणिका

सृष्टीतील जन्मोत्सवाचे दिग्दर्शन आहे. पहिला पाऊस पडल्यावर मातीचा जो गंध दरवळतो, त्याला अत्तराचा गंध असतो आणि या क्षणी अष्टदिशांमधून अभीष्टचिंतन केले जाते, त्याच वेळी त्या हिरव्या तृणपात्याचा जयजयकार होतो. सर्व सृष्टी जणू त्याचा सत्कार करते, अशी ही विलक्षण भावानुभूती आहे. यात निसर्गातील गंध, नाद, रंग, अखंड सृष्टीतील मांगल्य (अभीष्टचिंतन), जल्लोष (जयजयकार), आनंद (सत्कार) यांचा निनाद (घुमला) या सर्वांचा, या सर्व घटकांचा मिळून एक घाट, आकार म्हणजेच एक रूप तयार होते. या रूपात आशय कलात्मक पातळीवर येऊन अभिव्यक्तीशी पूर्णपणे एकरूप होतो. हे त्यांचे अभिन्नत्व विलक्षण संवेदनशील तर आहेच; पण त्याला एका सौंदर्यकृतीचे रूप प्राप्त होते. हा सौंदर्यानुभव म्हणजेच कविता. भावकवीचे संवेदनशील मन कसे कार्यरत होते, हे पाडगावकरांच्या पुढील ओळींमधे स्पष्टपणे दिसते –

दव बिंदूतिल हळवे स्पंदन
जाणिवेत कधी टिपून घेतो
गडद निराकाराची किमया
कधि शब्दांतुन फुलवित बसतो!

"हृदयसंवादाची रूपकळा त्यातून (या शब्दांतून) प्रकट होते" असे सोमनाथ कोमारपंत म्हणतात. (कोमरपंत, आरती २०१६, पृ. ७९.) इथे दवबिंदू, त्यातील 'हळवे' स्पंदन, कवीची जाणीव, 'गडद' निराकार आणि त्याची किमया, शब्द आणि कवीची निर्मितिक्षमता हे सर्व या कवितेचे घटक आहेत. या प्रत्येक घटकाचे या कवितेच्या एकूण आकारात, रूपात, घाटात महत्त्वाचे योगदान आहे. हे सर्व घटक इथे पूर्णपणे एकरूप झालेले आहेत. कवितेचा आशय आणि अभिव्यक्ती इथे अभिन्न झाले आहेत आणि म्हणूनच या कवितेला एक सौंदर्याकार प्राप्त झालेला आहे. दवबिंदूतील हळवे स्पंदन ही त्या निराकार परमेश्वराची किमया आहे आणि कवीने ही किमया आपल्या जाणिवेत टिपून घेतलेली आहे, आणि ती शब्दरूपाने प्रकट करण्याचा कवीचा प्रयत्न आहे. इथे निसर्गातील सौंदर्य (दवबिंदूतिल हळवे स्पंदन) त्याचा निराकार कर्ता, आणि त्याच्या किमयेची कवीला होणारी जाणीव अशी भावानुभूती आहे. इथे दवबिंदूतील स्पंदन कवीने टिपलेले असून ते स्पंदन 'हळवे' आहे आणि त्या निराकाराचा रंग 'गडद' आहे, हेही कवीने टिपलेले आहे. ही दोन्ही विशेषणे आशयाच्या सौंदर्याची वर्तुळे निर्माण करणारी आहेत. या विशेषणांना वाचकांनी त्यांना भावलेला अर्थ बहाल करायचा असतो. त्या वेळी ती कवीता वाचकांच्या भावविश्वातील जागा घेते. 'गडद' निराकाराची (परमेश्वर) किमया म्हणजे दवबिंदू आणि त्यात हळवे स्पंदनही आहे. म्हणजेच इथे चित्रित केलेले सौंदर्य निसर्ग, मानव (कवी) आणि परमेश्वर (निराकार) यांचा संबंध वाचकाच्या लक्षात आणून देणारे आहे. म्हणूनच यातील आशय सौंदर्यरूप धारण करतो. आणि या रूपाचा विस्तार वाचकाच्या आकलनशक्तीला आवाहन करीत राहतो. या एकूणच पूर्ण भावानुभवाला वाचक आपला स्वतःचा अर्थ देतो आणि ती कविता त्याच्या मनातील जागा (space) घेते. तेव्हा ती कविता कवीची नव्हे, त्या वाचकाची होते. निराकाराची ही किमया कवी शब्दांतून फुलवीत बसतो; कारण कवी हाही त्या निराकाराच्या निर्मितीचा एक भाग असतो. हळव्या स्पंदनाने युक्त अशा दवबिंदूप्रमाणे या कवितेतील परमेश्वर जरी 'निराकार' असला, तरी त्याच्या किमयेतील स्पंदनयुक्त दवबिंदू साकार आहे. इथे साकाराचा निर्माता निराकार आहे. दवबिंदू साकार आहे पण त्यातील स्पंदन डोळ्यांना स्पष्ट दिसणारे नाही. त्या स्पंदनाला मनातच आकार प्राप्त होतो; कारण तो त्या कवितेच्या एकूण आकाराचा (form) एक महत्त्वाचा घटक असतो. संपूर्ण चारही ओळी एका दवबिंदूभोवती फिरताना दिसतात. एका दवबिंदूच्या दर्शनातून (कवितेचे ते बीज आहे.) हा भावानुभवाचा प्रत्यय विस्तारत जातो. पण हा विस्तार वर्तुळाकार आहे, पसरट नाही; कारण तो 'दवबिंदू' या केंद्राशी सातत्याने निगडित राहतो याचे मुख्य कारण म्हणजे संपूर्ण कवितेला एक रूप, आकार प्राप्त झालेला आहे.

आपल्या काव्यनिर्मितीबद्दल पाडगावकर म्हणतात- "माझ्या मनात खोल कुठेतरी रुजलेल्या अनुभूतीचा क्षण, मातीचे कवच भेदून वर येणा-या हिरव्यागार पात्याप्रमाणे केव्हा आणि कसा प्रकट होतो, त्याचे रहस्य मलाच कळत नाही." (परब, २०१६, पृ. १२)

'निर्मिती' या कवितेत पाडगावकर म्हणतात :

त्या क्षणी या आकृतीचे बंधन
मलाच माझे नकळत गळले
विदेहीचे त्या क्षणी परंतु
आकाराचे रहस्य कळले
रहस्य कळले अंधाराला
कळले नक्षत्रांचे नाते
अन् मी भेदूनी भूमीचा भर
रुजलो होऊनी हिरवे पाते!

अंधाराला आकाराचे रहस्य कळते आणि त्याचे नक्षत्रांशी असलेले नातेही त्याला (अंधाराला) कळते, हा एक साक्षात्कारी क्षण असतो आणि त्यातून ज्याप्रमाणे भूमीत रुजलेल्या बीपासून हिरवे पाते अंकूरते, त्याप्रमाणे कविता उगवते.

डॉ. राजेश्रींनी घेतलेल्या मुलाखतीत पाडगावकरांनी त्यांची भूमिका अगदी स्पष्ट केलेली आहे. ते म्हणतात, "कवितेला विविध आकार मी मुद्दाम आणीत नाही. निरंतर साधनेतून विविध वाङ्मयाच्या रूपबंधाचे प्रयोग करण्याची माझ्या मेंदूला सवय लागलेली असावी . ते प्रयोग, फॉर्मची ताकद आजमावण्यासाठी मी कवितेचा प्रकार हाताळतो." (राजेश्री, २०१६, पृ. ५०) इथे 'फॉर्मची ताकद आजमावणे' हे शब्द खूप महत्त्वाचे आहेत. पाडगावकरांचा 'Formalism' प्रा. वाडेकरांनी अत्यंत समर्पकपणे विशद केलेला आहे. ते म्हणतात :

अनुभवालाही स्वतःचा एक रंग आहे.
एक नाद आहे, एक व्यक्तिमत्त्व आहे.
विविध रंग, गंधांच्या मिश्रणातून तो
अनुभव एकजीव होऊन बिलक्षण
सौंदर्यात न्हातो. पाडगावकरांचे हे
प्रतिभावैभव जाणल्याशिवाय
त्यांच्या कवितांमध्ये आपणाला शिरता
यायचे नाही. पाडगावकरांच्या प्रतिमांना,
मानसशास्त्रामध्ये 'वेदनामिश्रण'
असा शब्द येतो. स्वतः पाडगावकरांनी
आपल्या निसर्गानुभवाला
'तर्कबाह्य प्रतिमा संघटन' असे म्हटले आहे.....
पाडगावकरांना भेटायचे तर त्यांच्या 'तर्कबाह्य'
प्रतिमासंघटनेशी 'आपली मैत्री व्हायला
हवी.' (वाडेकर, २०१६, पृ. १०)

कवितेतील 'तर्कबाह्य प्रतिमा संघटना'ची मूळ संकल्पना कांट या जर्मन तत्त्ववत्त्याने प्रथम सूचित केलेली असून याच संकल्पनेचा विस्तार पुढे कोलरीजने इंग्रजीमध्ये केलेला आढळतो. प्रा. वाडेकर तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक असल्यामुळे त्यांनी याच लेखात (पृ. १०) 'immanent' आणि 'transcendent' या शब्दांचा वापर केलेला आहे. कांटने या संकल्पनांची कल्पनाशक्ती आणि प्रतिभेच्या संदर्भात चर्चा केलेली आहे.

रूपवादी समीक्षेला अभिप्रेत असलेले कवितेचे स्वरूप प्रा. वाडेकर पुढीलप्रमाणे विशद करतात–

अस्तित्वाचा सारा पसारा हीच
एक कविता आहे. गूढतेमुळे जे
काही खुणावते आहे, संकेत
करते आहे, त्यामध्ये कविता
लपलेली असते. निसर्ग
माणसाला चक्क डोळा मारतो
हे त्याचे डोळा मारणे ज्याला
उमगते, त्याला कवी म्हणतात.
कविता हे नुसते 'कळणे'
नाही, तर ते 'जाणवणे' आहे.
कवीला जीवनाचा जो तरल
(संवेदनशील) मंतरलेला
अनुभव येतो, तो समजावून
सांगणे, त्याचे विवरण
करून दाखविणे त्याला शक्य
नसते. उपमा, दृष्टांत,
दाखले हे कवितेचे डगले!
हे सारे अवकाशयानाच्या
उड्डाणानंतर गळून पडणारे
अपरिहार्य टप्पे. सारे
अलंकार, सोपस्कार उतरवून
कवितेला मूळ रूपात
भेटावे लागते. शब्द बाजूला
सारून कविता वाचायची असते.
अनुभवाची स्पंदने जाणवून देणे

अनुक्रमणिका

एवढेच कवी करतो, ही
अनुभवाची स्पंदने रसिकापर्यंत
पोचविण्यासाठी निसर्गातून
पाडगावकरांना प्रतिमा सुचतात. (९)

कवितेचे भावरूप वाचकाशी कसे संवादी होते, तेही प्रा. वाडेकरांनी रूपवादी समीक्षेच्या अंगाने स्पष्ट केले आहे. ते म्हणतात :

जॉर्ज बर्कले म्हणाला, 'The
essence of a thing is
its perception'. संवेदन हाच
सा-या अस्तित्वाचा प्राण आहे.
दिसणे हेच असण्याचे सार आहे.
जे जसे दिसत नाही, ते तसे
आहे असे कसे आणि का म्हणावे?
मोरांना पंख असतात.
पंखांवरच्या डोळ्यांना रंग असतात.
पण त्या मोरपंखांत हसणारा शामलवर्ण
मुरारी ही माझ्या डोळ्यांची
निर्मिती आहे....पाडगावकरांची कविता
झुळझुळणा-या झ-याला मनापासून
ताल द्यायला रसिकांना सांगते. (९)

मोराच्या पिसा-यात श्रीकृष्णाचे दर्शन घडणे यालाच रेगे कवितेचा 'मनोनीत फॉर्म' म्हणतात. हे दर्शनच ती कविता वाचक 'आपली' करतो, याची प्रचिती असते.

पाडगावकरांची निसर्गकविता रूपवादाशी किती एकरूप आहे; हे श्री. दत्तात्रय प्रभूंच्या पुढील ओळींतही स्पष्ट झालेले आहे. ते म्हणतात, "पाडगावकरांचे प्रत्येक गीत स्वतःची अशी अंगभूत लय घेऊन प्रकट झाले आहे. गीतातील उपमा, प्रतिमा, शब्दसंघटन व गीतातील भाव यांचा अनुबंध हा इतका एकजीव झालेला असतो की, त्यामुळे प्रत्येक गीताला एक आगळी प्रत्ययकारी लय प्राप्त झाली आहे." (प्रभू, २०१६, पृ. २३) कवितेतील उपमा, प्रतिमा, शब्दसंघटन व भाव यांचा एकजीव अनुबंध निर्माण होणे म्हणजेच त्या कवितेला सौंदर्याकार, घाट, 'Form' प्राप्त होणे होय. यालाच रूपवाद किंवा Formalism म्हणतात. उदा., पाडगावकरांच्या पुढील ओळी पहा :

पखवाज ढगातून गाजे
झाडातून लेझीम वाजे
पाण्याने भिजले गाणे
मातीतुन रुजले गाणे
त्या गाण्याचे झाड उगवले
झाडच झाले गाणे.

प्रभू म्हणतात ती प्रत्ययकारी लय ती हीच. या लयीचे, या भावानुभवाचे सौंदर्यरूप म्हणजेच या ओळी. काव्यनिर्मितीत ही लय कशी येते याबद्दल पाडगावकर म्हणतात, "आधी ठरवून मी कविता लिहायला बसत नाही. एखादी ओळ अचानक माझ्या मनात येते किंवा सुचते. ती ओळ मी गुणगुणू लागलो किंवा मनात घोळवू लागलो की, मला आतून कळू लागते कुठल्या दिशेने जायचे आहे ते." (सावंत, २०१६, पृ. ३६). रूपवादी समीक्षेला हीच काव्यनिर्मितीची प्रक्रिया अभिप्रेत आहे. उदा., पावसाचे थेंब खिडकीवर येणे हा साक्षात अनुभव. पाडगावकर त्याच भावानुभवाची कविता करतात ती अशी –

दोस्त आपुला पाऊस आला,
उघडा खिडक्या दारेऽऽ
थेंब होऊनी मुठीत आले,
आभाळातील तारे ऽऽ

थेंब आभाळातून येतात, त्यांचा आकार ता-यांसारखा भासतो म्हणून आभाळातील तारेच थेंबांच्या रूपाने पृथ्वीवर येत आहेत आणि मग या 'ता-यांना' आपल्या मुठीत घट्ट पकडून ठेवण्याची ऊर्मी मनात निर्माण होते, असा हा भावबंध आहे. अवघ्या १३ शब्दांत पकडलेला हा भावानुभव ही सौंदर्याकृती निर्माण करतो. हेच भावानुभवाचे रूप विशद करणे हे रूपवादी समीक्षेचे ध्येय असते. पाऊस आल्यावर दारेखिडक्या बंद करणारे आपण आणि त्या वेळी दारे-खिडक्या उघडून पावसाचे स्वागत करणारे पाडगावकर हाच कवी आणि सामान्य माणूस यांच्यातील फरक आहे. पावसाचे मुठीत येणारे थेंब माणसाचे आकाशाशी असणारे नाते चित्रित करतात. खरे म्हणजे माणसाचे निसर्गाशी– परमेश्वराशी– असलेले नाते हेच पाडगावकरांना ध्वनित, सूचित करावयाचे आहे.

रूपवादी समीक्षेचे मूलतत्त्व खुद्द पाडगावकरांनी

स्पष्टपणे सांगितलेले आहे. ते म्हणतात, "कवितेला कवितेचेच निकष लावायला हवेत, स्वतःचे नव्हे." (राजेश्री, २०१६, पृ. ५२)

**५**

या लेखासाठी मंगेश पाडगावकरांच्या फक्त निसर्गकविताच – त्यातही प्रामुख्याने त्यांच्या पाऊसविषयक कविताच – निवडलेल्या आहेत, ही या लेखाची मर्यादा आहे. पण या मर्यादेत राहूनही पाडगावकरांची रूपवादाची संकल्पना आणि त्यातून त्यांचे कवितालेखन कसे 'आकारित' झाले आहे, हे सुस्पष्टपणे मांडण्याचा हा प्रयत्न आहे.

विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात मार्क्सवादी समीक्षा आणि सौंदर्यवादी, रूपवादी समीक्षा यांचे द्वंद खेळले गेले. तो अभिनिवेश आता या नव्या शतकाच्या पहिल्या दीड दशकानंतर बाजूला सारून दोन्ही समीक्षापद्धतींचे उपयोजन मराठी कवितेला कसे उपकारक ठरेल, हे पाहणे महत्त्वाचे आहे. विशेषतः श्री. राजन खान यांच्या दै. लोकसत्तेच्या दि. २९ मे १६ च्या 'वास्तव मराठी साहित्याचं' या ऐतिहासिक लेखानंतर आपण मराठी समीक्षेकडे सम्यक दृष्टीने पाहणे खूप आवश्यक आहे.

**संदर्भ** :

१. आचवल, माधव : (१९७२) रसास्वाद, मुं. मराठी साहित्य संघ, प्रस्तावना पृ. ३.

२. कोमरपंत, सोमनाथ : 'सप्रेम द्या निरोप बहरून जात आहे.' आरती : मंगेश पाडगावकर विशेषांक, सावंतवाडी, पृ. ७९.

३. खांडेकर, भालचंद्र; गोवारीकर, लीला : (१९७९), पाश्चात्त्य साहित्य-विचार, अनमोल प्रकाशन, पुणे, पृ. १३९.

४. दावतर, वसंत : १९८२, 'साहित्य, साहित्यसमीक्षा आणि सौंदर्यदृष्टी', नवसमीक्षा : काही विचारप्रवाह, मेहता प्रकाशन, पुणे, पृ. ७०.

५. दावतर, वसंत : (मे १९७९) 'आत्मनिष्ठ समीक्षा', आलोचना, मुंबई, पृ. ३.

६. परब, उषा : (मे २०१६), 'पाडगावकरांच्या कवितेचे रंगारंग' आरती, सावंतवाडी, पृ. १२.

७. प्रभू, दत्तात्रय ना : (मे २०१६), 'मंगेश पाडगावकरांच्या साहित्यसौंदर्यावर एक दृष्टिक्षेप', आरती, सावंतवाडी, पृ. २३.

८. राजेश्री : (मे २०१६) 'मंगेश पाडगावकरांच्या गाठीभेटी' आरती, सावंतवाडी, पृ. ५०.

९. वाडेकर काशिनाथ : (मे २०१६) 'मंगेश पाडगावकर नावाचा जिप्सी धावत आहे', आरती, पृ. १०.

१०. सावंत सुनिल : (मे २०१६) 'महाकवी मंगेश पाडगावकर', आरती, सावंतवाडी, पृ. ३६.



